रोजगार व स्वयंरोजगार यंत्रणेतील रोजगार
व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी (गट-ब)
या पदावर पदोन्नती देणेबाबत...............

**महाराष्ट्र शासन**
रोजगार व स्वयंरोजगार विभाग,
शासन निर्णय क्रमांकः-इएसई-२०१०/प्र.क्र.८४/प्रशा-२,
नवीन प्रशासकीय भवन, १४ वा मजला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- ०६ मे, २०११.

संदर्भ : १.समक्रमांकाचा दिनांक २१/०२/२०११ रोजीचा शासन निर्णय.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संदर्भाधीन दिनांक २१/०२/२०११ च्या शासन निर्णयान्वये श्री.वि.स.शार्दुल, कनिष्ठ रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, गट-क, रोजगार व स्वयंरोजगार विभागीय मुख्यालय, नाशिक यांना रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, गट-ब या पदावर पदोन्नती देऊन त्यांची पदस्थापना जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र, बुलढाणा येथे करण्यात आली होती.

२. सदर शासन निर्णयामध्ये अंशतः बदल करुन श्री.वि.स.शार्दुल, कनिष्ठ रोस्वरोमाअ, रोजगार व स्वयंरोजगार विभागीय मुख्यालय, नाशिक यांची जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र, बुलढाणा येथे केलेली पदस्थापना रद्द करुन आता त्यांची पदोन्नतीने पदस्थापना रोजगार व स्वयंरोजगार विभागीय मुख्यालय, नाशिक येथे रिक्त असलेल्या रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, गट-ब पदावर करण्यात येत आहे.

३. वरील कर्मचाऱ्यांनी त्यांच्या सध्याच्या पदाचा कार्यभार विभागीय उप संचालकांच्या सहमतीने अन्य कर्मचाऱ्यांकडे सोपवून पदोन्नतीच्या पदाचा कार्यभार तात्काळ स्वीकारावा.

४. वरील कर्मचारी- ज्या दिवशी पदोन्नतीच्या पदावर रूजू होतील त्या दिवसापासून त्यांना पदोन्नती विषयक लाभ अनुज्ञेय होतील.

५. उपरोक्त पदोन्नती मा.उच्च न्यायालयातील मूळ याचिका क्रमांक : ८४५२/२००४ मधील न्यायालयाच्या अंतिम निर्णयास अधीन राहून करण्यात येत आहेत.

६. आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय यांनी तसेच, संबंधित विभागीय उप संचालक यांनी उपरोक्त आदेशाची विनाविलंब अंमलबजावणी करून, त्याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०५०६१६४६०३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

-स्वा--
(वि. रा. शिरसाट )
शासनाचे उप सचिव

प्रत,

१. मा. मंत्री (रोजगार व स्वयंरोजगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. राज्यमंत्री (रोजगार व स्वयंरोजगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
५. आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई,
६. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन- १२ व १६-ब), मंत्रालय, मुंबई,
७. उप संचालक, रोजगार व स्वयंरोजगार, विभागीय मुख्यालय, नवी मुंबई / पुणे / नागपूर /अमरावती/औरंगाबाद/नाशिक,
८. सहायक संचालक, जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र, बुलढाणा
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
११. जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा/नाशिक
१२. संबंधित अधिकारी (आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई यांचे मार्फत)
१३. निवड नस्ती.